**राज्यात दिनांक ९,१०,व ११ नोव्हेंबर,२००९ दरम्यान झालेले चक्रीवादळ,अवेळी पाऊस तसेच तद्‌नंतर दिनांक १८ नोव्हेंबर,२००९ पर्यन्त झालेला अवेळी पाऊस/अतिवृष्टी यामुळे बाधीत झालेल्या शेतक-यांना मदत अदा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक : नैसआ-२००९/प्र.क्र.२२७/१०-अे
मंत्रालय,मुंबई-४०००३२,
दिनांक : ८ जानेवारी,२०१०

**वाचा:-**

१) शासन निर्णय महसूल व वन विभाग,क्रमांक सीएलएस-२००९/व्र.क्र.२०४/म-३, दिनांक २६ नोव्हेंबर.२००९
२) शासन ज्ञापन वित्त विभाग आकनि-११०९/४५/अर्थसंकल्प-६,दिनांक १ डिसेंबर,२००९
३) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक सीएलएस-२००९/प्र.क्र.२०६/म-३, दिनांक २ डिसेंबर, २००९.
४) शासन निर्णय कृषि व पदुम विभाग, क्रमांक : नैसआ-२००९/प्र.क्र.२२७/१०-अे, दिनांक ४ डिसेंबर,२००९
५) शासन निर्णय महसूल व वन विभाग क्रमांक सीएलएस-२००९/प्र.क्र.२०६/म-३, दिनांक २९ डिसेंबर, २००९.

**शासन निर्णय:-**

राज्यामध्ये दिनांक ९,१० व ११ नोव्हेंबर,२००९ या कालावधीत कोकण विभागात आलेले चक्रीवादळ,अवेळी पाऊस व इतर विभागांमध्ये अतिवृष्टी निर्माण झाली. तसेच तद्‌नंतर दिनांक १८ नोव्हेंबर २००९ पर्यन्त अवेळी पाऊस/अतिवृष्टी होऊन राज्याच्या अन्य भागातील शेतीक्षेत्राचेसुध्दा नुकसान झाले. सदर नुकसानीच्या अनुषंगाने पंचनाम्यानुसार बाधित शेतक-यांना मदत वाटपासाठी शासन निर्णय क्रमांक-नैसआ-२००९/प्र.क्र.२२७/१०-अे,दिनांक ४ डिसेंबर,२००९ अन्वये रू.१००.०० कोटी इतका निधी वितरित करण्यात आलेला आहे.आपदग्रस्त शेतक-यांना मदत वाटपासाठी उर्वरित अनुदान वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

२. नोव्हेंबर २००९ मध्ये चक्रीवादळ,अवेळी पाऊस व अतिवृष्टी यामुळे शेतीपिके / फळपिके यांचे झालेल्या नुकसानीबाबत आपदग्रस्त शेतक-यांना शासनाने घेतलेल्या निर्णयानुसार मदत वाटपासाठी महसूल व वन विभागाने कृषि विभागाला यापुर्वी रू.१००.०० कोटी रकमेचे वितरण केले आहे आता प्रलंबित असलेल्या मागणीपोटी महसूल व वन विभागाने रू.१४६.०० कोटी इतके अनुदान संदर्भ क्रमांक ५ येथील दिनांक २९ डिसेंबर,२००९ च्या शासन निर्णयान्वये वितरित केले असून त्यापैकी रू.१००.०० कोटी इतके अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणाली (B.D.S.)व्दारे कृषि विभागास उपलब्ध करून दिले आहेत व सदर अनुदान खर्च करण्यास कृषि विभागास

प्राधिकृत केले आहे.सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना क्रमांक ५ नुसार सदर अनुदान संबधित जिल्हयास वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. आपदग्रस्त शेतक-यांना वरील प्रमाणे मदत देण्यासाठी " मागणी क्रमांक सी-६,२२४५-नैसर्गिक आपत्तीच्या निवारणासाठी सहाय्य - ०२ - पूर,चक्रीवादळे इत्यादी-१०१-अनुग्रह सहाय्य, (०४)सवलती - (०४)(०५) इतर बाबी - (२२४५ ०२४४) (योजनेतर) - ३१ सहाय्यक अनुदाने " या मुख्य लेखाशिर्षाखाली सन २००९-२०१० करिता पुरक मागणीव्दारे उपलब्ध झालेल्या रू.१४६.०० कोटी (रुपये एकशे शेहचाळीस कोटी फक्त ) अनुदानापैकी अर्थसंकल्प वितरण प्रणाली(B.D.S.)व्दारे उपलब्ध करून दिलेली रू.१००.०० कोटी (रूपये शंभर कोटी फक्त )इतकी रक्कम चालू वित्तीय वर्षात सन २००९-२०१० मध्ये खर्च करण्यासाठी आयुक्त (कृषि),महाराष्ट्र राज्य,पुणे यांना आंहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. तसेच हया निधीचे सोबत जोडलेल्या विवरणपत्रातील रकाना क्रमांक ५ नुसार सदर अनुदान संबधित जिल्हयास वितरित करण्यास आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य,पुणे यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

३.१ कोणत्याही परिस्थितीत मंजूर केलेल्या निधीच्या रु.१००.०० कोटी (रूपये शंभर कोटी फक्त )मर्यादेपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची दक्षता नियंत्रण अधिका-यांनी घ्यावी.सदर रकमेचा विनियोग शासनाच्या महसूल व वन विभागाने वरील संदर्भाधिन दिनांक २६.११.२००९ रोजीच्या शासन निर्णयानुसार विहीत केलेल्या धोरणानुसार पंचनाम्यातील बाधित शेतक-यांना मदत करावयाच्या कामासाठीच करण्यात यावा व या संदर्भात नियंत्रण अधिका-यांनी त्याबाबतचे लेखा हिशेब ठेवून निधीच्या विनियोगाबाबतची माहिती शासनास सादर करावी.तसेच आकस्मिकता निधीतून काढलेला निधी यापुढे आकस्मिकता निधीच्या खर्चखाती न टाकता, एकत्रित निधीच्या खाती खर्ची टाकण्यात यावा.

३.२ सदर अनुदानाची रक्कम आयुक्त कृषि, महाराष्ट्र राज्य,पुणे यांनी विनाविलंब १० दिवसात वितरित करावी.त्याचप्रमाणे महसूल व वन विभाग तसेच या विभागाला प्रथम अहवाल दिनांक १५ जानेवारी,२०१० पर्यंत पाठवावा.प्रत्येत महिन्याच्या ५ तारखेपर्यंत आधिच्या महिन्यातील मासिक खर्चाचे विवरणपत्र न चुकता पाठवावे.अनुदान वाटपासंबधीचे उपयोगिता प्रमाणपत्र दिनांक २० मार्च,२०१० पर्यंत या विभागास पाठविण्यात यावे.

४. नियंत्रण अधिकारी यांनी अनुदान वाटपाची एक प्रत अपर मुख्य सचिव(मदत कार्य व पुर्नवसन), महसूल व वन विभाग यांना तसेच या विभागास दिनांक १५ जानेवारी,२०१० पर्यंत न चुकता सादर करावी. आहरण व संवितरण अधिका-यांनी कोषागार /उपकोषागार यांचेकडे पाठविण्यात येणा-या बिलांसोबत जोडल्या जाणा-या कॉम्पुटर स्लिपमध्ये गौण / उपशिर्षाचा गणकयंत्र संकेतांकाचा न चुकता उल्लेख करावा, असे आदेश कृपया संबधित अधिका-यांना नियंत्रण अधिकारी यांनी दयावेत. तसेच कोषागारातून /उपकोषागारातून आंहरित केलेल्या रकमेचा अहवाल शासनास सादर करावा. खर्चावर नियंत्रण ठेवून ,फार मोठया रकमेच्या पुरक मागण्या व त्यापेक्षा जादा रकमेचे परतावे करण्याचे टळेल, अशी दक्षताही संबधित अधिका-यांनी घेणे आवश्यक आहे.

५.	वरिलप्रमाणे आपदग्रस्त शेतक-यांना दयावयाची मदत आणि अनुदान वाटप करताना अनुसरावयाची पध्दत संदर्भाधिन अनुक्रमांक ४ येथील शासन निर्णय क्रमांक : नैसआ-२००९/प्र.क्र.२२७/१०-अे, दिनांक ४ डिसेंबर,२००९ मध्ये नमूद केल्याप्रमाणे राहिल.

६.	हा शासन निर्णय महसूल व वन विभागाच्या शासन निर्णय क्रमांक सीएलएस-२००९/ प्र.क्र.२०६/म-३, दिनांक २९ डिसेंबर, २००९ अन्वये त्या विभागाने कृषि विभागास प्राधिकृत केल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७.	हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०१००१०८१५१३२२००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

( आ.ग.परदेशी )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रति

आयुक्त (कृषि) महाराष्ट्र राज्य,पुणे.
विभागीय आयुक्त कोकण विभाग
विभागीय आयुक्त,नाशिक/पुणे/औरंगाबाद/अमरावती/नागपूर.
सर्व संचालक/सहसंचालक,कृषि आयुक्तालय,पुणे.
सर्व विभागीय कृषि सहसंचालक,कृषि आयुक्तालय,पुणे.
महालेखापाल महाराष्ट्र राज्य-१/२,मुंबई/नागपूर.
जिल्हाधिकारी,ठाणे,रागयड,रत्नागिरी,सिंधुदुर्ग,नाशिक/धुळे/जळगांव/अहमदनगर/पुणे/सोलापूर/साताश/ सांगली/ कोल्हापूर/औरंगाबाद/लातूर/उस्मानाबाद/वाशिम/अमरावती/बुलढाणा/चंद्रपूर/गोंदिया/भंडारा
मुख्य कार्यकारीअधिकारी,जिल्हापरिषद,ठाणे,रागयड,रत्नागिरी,सिंधुदुर्ग,नाशिक/धुळे/जळगांव/ अहमदनगर / पुणे/सोलापूर/सातारा/सांगली/कोल्हापूर/औरंगाबाद/लातूर/उस्मानाबाद/वाशिम/अमरावती/बुलढाणा/चंद्रपूर/ गोंदिया/भंडारा
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी,ठाणे,रागयड,रत्नागिरी,सिंधुदुर्ग,नाशिक/धुळे/जळगांव/ अहमदनगर/पुणे/ सोलापूर/ सातारा/सांगली/कोल्हापूर/औरंगाबाद/लातूर/उस्मानाबाद/ वाशिम/अमरावती/बुलढाणा/चंद्रपूर/ गोंदिया/भंडारा
जिल्हा कोषागारअधिकारी,ठाणे,रागयड,रत्नागिरी,सिंधुदुर्ग,नाशिक/धुळे/जळगांव/ अहमदनगर/पुणे/ सोलापूर/सातारा/सांगली/कोल्हापूर/औरंगाबाद/लातूर/उस्मानाबाद/वाशिम/अमरावती/ बुलढाणा/ चंद्रपूर/ गोंदिया/भंडारा
कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे,रागयड,रत्नागिरी,सिंधुदुर्ग,नाशिक/धुळे/जळगांव/ अहमदनगर/पुणे/सोलापूर/सातारा/सांगली/ कोल्हापूर/औरंगाबाद/लातूर/उस्मानाबाद/वाशिम/ अमरावती/ बुलढाणा/चंद्रपूर/गोंदिया/भंडारा
महसूल व वन विभाग (म-३)
वित्त विभाग (व्यय-१, अर्थसंकल्प १३ अर्थोपाय)
सहसंचालक,लेखा व कोषागारे,
संगणक कक्ष,५ वा मजला,नवीन प्रशासन भवन,मुंबई-३२
सर्व सहसचिव/उप सचिव/अवरसचिव कृषि व पदुम विभाग
विभागातील सर्व कार्यासन अधिकारी,

प्रत:

मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव/मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
मा.मुख्य सचिव/सर्व विभागांचे प्रधान सचिव/सचिव
मा.मंत्री (कृषि)यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
ग्रंथपाल,महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय,ग्रंथालय सहावा मजला,विधान भवन,मुंबई-३२
माहिती जनसंपर्क संचालनालय,मंत्रालय,मुंबई-३२
निवडनस्ती

# विवरणपत्र

## शासन निर्णय कृषि व पदुम विभाग क्रमांक : नैसआ-२००९/प्र.क्र.२२७/१०-अे, दिनांक -०८ जानेवारी,२०१० चे सहपत्र

(रूपये लाखात)

| अ.क्र | जिल्हा | एकूण अनुदान | यापुर्वी दि.४.१२.२००९ च्या शासन निर्णयान्वये वितरित केलेले अनुदान | वितरित करावयाचे अनुदान | उर्वरित अनुदान |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | ठाणे | ३५२२.५८ | ३५२२.५८ | - | - |
| २ | रायगड | २७०३.७३ | २७०३.७३ | - | - |
| ३ | रत्नागिरी | २७८.९२ | २७८.९२ | - | - |
| ४ | सिंधुदुर्ग | ५.२७ | ५.२७ | - | - |
| ५ | नाशिक | ७४२०.२६ | १४३१.२६ | ४०९७.०० | १८९२.०० |
| ६ | धुळे | ४२.०१ | ८.१० | २३.२१ | १०.७० |
| ७ | जळगाव | १२४.६७ | २४.०५ | ६८.७५ | ३१.८७ |
| ८ | अहमदनगर | १०६५.३८ | २०५.४९ | ५८७.५० | २७२.३९ |
| ९ | पुणे | ३९३३.८७ | ७५८.७९ | २१७१.०० | १००४.०८ |
| १० | सातारा | ४५५.५५ | ८७.८७ | २५१.५० | ११६.१८ |
| ११ | सांगली | १६५७.९४ | ३१९.८२ | ९१४.०० | ४२४.१२ |
| १२ | कोल्हापूर | ४३.५४ | ८.४० | २४.०७ | ११.०७ |
| १३ | उस्मानाबाद | १८.०० | ३.४७ | १४.५३ | - |
| १४ | अमरावती | १५.०० | २.८९ | १२.११ | - |
| १५ | बुलढाणा | १४.२७ | २.७५ | ११.५२ | - |
| १६ | चंद्रपूर | ३२६.५१ | ६२.९८ | १८०.५० | ८३.०३ |
| १७ | गोंदिया | १५३५.२६ | २९६.२६ | ८४७.६० | ३९१.४० |
| १८ | भंडारा | ८१७.५० | १५७.६८ | ४५१.०० | २०८.८२ |
| १९ | सोलापूर | ६०४.०० | ११६.५० | ३३३.१६ | १५४.३४ |
| २० | वाशिम | १.३३ | ०.२६ | १.०७ | - |
| २१ | औरंगाबाद | २.१५ | ०.५७ | १.५८ | - |
| २२ | लातूर | १२.२६ | २.३६ | ९.९० | - |
| **एकूण** | | **२४६००.००** | **१००००.००** | **१००००.००** | **४६००.००** |